**औद्योगिक प्रशिक्षण संस्थेतील अधिकारी, शिल्पनिदेशक व लिपिक वर्गीय कर्मचाऱ्यांच्या प्रशिक्षण कार्यक्रमांस प्रशासकीय मान्यता देणेबाबत**

# महाराष्ट्र शासन

**कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : शिप्रका-२०२०/प्र.क्र.०६/व्यशि-३,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : २५ फेब्रुवारी, २०२२

वाचा :

१) उच्च व तंत्र शिक्षण विभाग शासन निर्णय क्र. व्हीओसी-२०१०/प्र.क्र.३०१/व्यशि-४ दिनांक १२.०८.२०११
२) वित्त विभाग शासन निर्णय क्र. प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५ दिनांक ०३.०३.२०१०
३) वित्त विभाग शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२ दिनांक १७.०४.२०१५
४) संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र:१२/नियोजन/प्रशि.का.आ/२०२१-२२/ ५४ दि. ०९.०२.२०२२

**प्रस्तावना :**

कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग अंतर्गत शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेंतर्गत ४१७ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्था, प्रगत व्यवसाय प्रशिक्षण योजनेंतर्गत ८ संस्था, हायटेक प्रशिक्षण योजनेंतर्गत १ संस्था, यंत्रनिगराणी पथक २ संस्था कार्यरत आहेत. शिल्प कारागिर प्रशिक्षण योजनेंतर्गत ४१७ शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधून १०२ विविध व्यवसाय अभ्यासक्रमांमधून अंदाजे २ लाखापेक्षा जास्त प्रशिक्षणार्थ्यांना प्रशिक्षण दिले जाते. व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालयांतर्गत शिल्प कारागिर प्रशिक्षण योजना, शिकाऊ उमेदवारी योजना, प्रगत प्रशिक्षण योजना, हायटेक प्रशिक्षण योजना, यंत्रनिगरणी पथक या योजनांखाली १०,१३३ कर्मचारी कार्यरत आहेत.

राज्यात शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थांमध्ये प्राचार्य, उपप्राचार्य, निरीक्षक, व्यवस्थापक, सहाय्यक प्रशिक्षणार्थी सल्लागार असे कर्मचारी कार्यरत आहेत. संदर्भ क्र. ४ अन्वये संचालक व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांनी दिलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने राज्यातील औद्योगिक आस्थापनामध्ये होणारे बदल तसेच अद्यावत तांत्रिक ज्ञान वृध्दींगत करण्यासाठी प्रशिक्षणाची आवश्यकता आहे. औद्योगिक आस्थापनेमध्ये तंत्र वेगाने बदलत असून अद्यावत तंत्रज्ञाचा वापर करण्यासाठी नविन तंत्र शिकणे आवश्यक आहे. अशा प्रकारे नविन पध्दती आणि प्रक्रियांमध्ये कर्मचारी आणि अधिकारी यांना अद्यावत प्रशिक्षण देणे ही निरंतर प्रक्रिया आहे. ही बाब लक्षात घेऊन उपलब्ध मनुष्यबळाची कार्यक्षमता व उत्पादकता पर्यायाने प्रशिक्षणाची गुणवत्ता वाढविण्यासाठी व प्रशासकीय कामकाजामध्ये गती निर्माण करण्यासाठी अधिकारी व कर्मचारी वर्गास प्रशिक्षण देण्याचा कार्यक्रम हाती घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :

उपरोक्त विवेचन विचारात घेता संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय यांच्या अधिपत्याखालिल कार्यालयातील अधिकारी व कर्मचारी व औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील अधिकारी व कर्मचारी यांच्या प्रशिक्षण कार्यक्रमास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून मान्यता देण्यात येत आहे.

१. या योजनेंतर्गत शासकीय औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील कर्मचारी व शिक्षकीय कर्मचाऱ्यास प्राधान्य देण्यात यावे.
२. हे प्रशिक्षण कार्यक्रम जिल्हा/विभागीय स्तरावर व सर्व सोयी सुविधा उपलब्ध असलेल्या ठिकाणी घेण्यात यावे.
३. प्रशिक्षण कार्यक्रमामध्ये संबंधित व्यवसाय अभ्यासक्रमाचे अद्यावत ज्ञान, आधुनिक दृकश्राव्य माध्यमांचा उपयोग, सूचनात्मक साहित्य, शिकविण्याच्या नविन पध्दती/ तंत्रज्ञान, मानसशास्त्रीय बाबी तसेच प्रशिक्षणार्थ्यांना हाताळण्याच्या पध्दती इत्यादीचा अंतर्भात करण्यात यावा.
४. अधिकाऱ्यांना देण्यात येणाऱ्या प्रशिक्षणामध्ये नेतृत्व विकास, प्रशासकीय व आर्थिक बाबी, विद्यार्थी हित, सुप्रशासन व व्यवस्थापकीय कौशल्य इत्यादी बाबीचा समावेश करण्यात यावा.
५. अधिकारी/ कर्मचारी यांना सुरक्षेचे प्रशिक्षण देऊन दुर्घटनाची संख्या कमी करणे.
६. अधिकारी/कर्मचारी यांना अद्यावत सयंत्रे आणि उपकरणे कार्यक्षमतेने हाताळण्यासाठी प्रशिक्षण देण्यात यावे.
७. अधिकारी/कर्मचाऱ्यांना शासन नियम, माहिती अधिकार अधिनियम-२००५ कायदा, न्यायालयीन प्रकरणे, वित्तिय, भांडार व्यवस्थापन, आस्थापना विषयक बाबी, प्रशासकीय बाबी हाताळणे, तसेच उन्नत तंत्रज्ञानाची ओळख व कौशल्याचे प्रशिक्षण इत्यादी बाबीचा समावेश करावा.तसेच समुपदेशन, सकारात्मक दृष्टिकोन, मुल्यमापन प्रक्रिया, खाजगी औद्योगिक आस्थापनांसोबत सुसंवाद, सामान्य कौशल्य, उद्योजकता, शिकाऊ उमेदवारी प्रशिक्षण, रोजगार व स्वयंरोजगार यांचा समावेश करण्यात यावा. प्रेरणा व सेवा प्रशिक्षण (Induction & Service Training) चा अंतर्भाव करण्यात यावा. सदर प्रशिक्षण कार्यक्रमाचा कालावधी गरजेनुसार निश्चित करण्यात यावा.
८. आवश्यकता भासल्यास सदर प्रशिक्षणासाठी या क्षेत्रातील बाहेरील तज्ञ मार्गदर्शकांना आमंत्रित करण्यात यावे.
९. नविन तंत्रज्ञानानुसार झालेल्या बदलानुसार शिल्प निदेशकांसाठीच्या कार्यक्रमामध्ये त्यांच्याशी संबंधित औद्योगिक आस्थापना सुसंगत प्रशिक्षण देण्यात यावे.
१०. या कार्यक्रमांत आधुनिक व नाविन्यपूर्ण अशी प्रयोगशाळा (उदा. संवाद प्रयोगशाळा, डिजीटल लायब्ररी,प्राजेक्ट लॅब) उभारण्यात यावी. कार्यशाळा व परिषद यावर अनुषंगिक खर्च करण्यात यावा.

११. अ) प्रशिक्षण कार्यक्रमांच्या खर्चाची कमाल मर्यादा प्रति प्रशिक्षणार्थी, प्रति दिन रु. २५००/- इतकी असून यामध्ये शैक्षणिक साहित्य, तज्ञाचे मानधन, त्यांचा प्रवास व राहण्याचा खर्च, तसेच जागेचे भाडे,स्टेशनरी, छपाई, आस्थापना भेटी व इतर सुविधांवरील खर्च यांचा अंतर्भाव राहील.

ब) अधिकारी व कर्मचारी यांच्या प्रवास व दैनंदिन भत्याचा खर्च शासनाच्या संदर्भाधिन क्र.२ येथील शासन निर्णयातील प्रचलित नियमानुसार लागू राहील.

१२. या प्रशिक्षण कार्यक्रमावर होणारा खर्च मागणी क्र. ZA-२-२२३०, कामगार व सेवायोजन, (०२) (०७) कर्मचारी वर्गाचे प्रशिक्षण (कार्यक्रम) (२२३० ए १९२) १३, कार्यालयीन खर्च या लेखाशिर्षांतर्गत विविध उद्दिष्टाखाली प्रतिवर्षी उपलब्ध होणाऱ्या तरतुदीमधून खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

१३. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय, मुंबई तथा आहरण व संवितरण अधिकारी यांनी सदर योजनेसाठी उपलब्ध होणारा निधी खर्च करण्याची दक्षता खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून घ्यावी.

१. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई यांनी प्रशिक्षणाबाबतच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र शासनास विहीत कालावधीत सादर करावे.

२. वित्त व नियोजन विभाग यांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश, सूचना, परिपत्रके, अटी व शर्तीचे कोटेकोरपणे पालन करावे.

१४. औद्योगिक प्रशिक्षण संस्थामधील प्रशिक्षणास खर्चास वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ अन्वये वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उप विभाग-चार, खर्चाच्या संकीर्ण बाबी संबंधी प्रदान करण्यात आलेले वित्तीय अधिकार यामधील अ.क्र. १० अन्वये भारतातील प्रशिक्षण फी वरील खर्च मंजूर करण्यास प्रशासनिक विभागास प्रदान केलेल्या वित्तिय अधिकारान्वये मंजूरी देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०२२५१६४३३५०५०३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Vinod Sheshrao Bondre

Digitally signed by Vinod Sheshrao Bondre
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Skill Development and Entrepreneurship Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4bd97b779f6f1e9e61491311a06aac663b01b00963f2e754c6ee2d5f7c14953d, serialNumber=c313a8b86d67716d182c41d1e22f57d99c8ee5f4654a216d8fe23b5ad24ed271, cn=Vinod Sheshrao Bondre
Date: 2022.02.25 16:46:09 +05'30'

**( विनोद बोंदरे )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रधान सचिव, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. उप सचिव, कौशल्य विकास रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
३. व्यशि-१,व्यशि-४,कौशल्य-२ कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५. सहसंचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, प्रादेशिक कार्यालय, मुंबई/पुणे/नाशिक/ औरंगाबाद/अमरावती/नागपूर,

६. उपसंचालक, विभागीय मुख्यालय, कौशल्य विकास, रोजगार व उद्योजकता, मुंबई/पुणे/ नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर

७. सह/उप संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, संचालनालय,मुंबई

८. जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण अधिकारी, जिल्हा व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण कार्यालय (संचालनालयामार्फत)

९. निवड नस्ती, व्यशि-३.